**संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था,**
**औरंगाबाद पदावर नियुक्ती.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसपीआय-२०१४/(प्र.क्र.१६२/१४)/का-२८,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २५ सप्टेंबर, २०१४

**वाचा — महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे पत्र क्र.२२४६/ ९६२४/ पंधरा, दिनांक ०५/०५/२०१४.**

**प्रस्तावना —**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने संदर्भाधिन दिनांक ०५/०५/२०१४ च्या पत्रान्वये संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद, गट "अ" या पदावर ले. कर्नल (निवृत्त) उदय सुधाकर पोळ यांच्या नावाची शिफारस केलेली आहे. आयोगाच्या सदर पत्रातील सूचनांच्या अनुषंगाने ले. कर्नल (निवृत्त) उदय सुधाकर पोळ यांचा साक्षांकन नमूना शासनास प्राप्त झालेला असून त्यांच्या शैक्षणिक अर्हतेबाबतची सर्व कागदपत्रे त्यांच्या मूळ प्रमाणपत्रावरुन तपासण्यात आलेली आहेत. त्यांचा चारित्र्य पडताळणीबाबतचा अहवाल पोलीस अधीक्षक, अहमदनगर यांच्याकडून प्राप्त झाला असून, तो समाधानकारक आहे. त्यांनी मुळ अधिवास प्रमाणपत्र सादर केलेले आहे. त्यांचा लष्करी सेवेमधील मागिल ५ वर्षांचा गोपनीय अहवाल प्राप्त झाला असून तो समाधानकारक आहे. तसेच त्यांच्याबाबतीत स्थायी वैद्यकीय महामंडळ, ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे यांचे ते वैद्यकीयदृष्ट्या पात्र असल्याचे प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात आले आहे. या पार्श्वभूमीवर ले. कर्नल (निवृत्त) उदय सुधाकर पोळ यांना संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या पदावर नियुक्ती देण्याबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय—**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या दिनांक ०५/०५/२०१४ च्या पत्रान्वये करण्यात आलेल्या शिफारशीनुसार ले. कर्नल (निवृत्त) उदय सुधाकर पोळ यांची संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद, गट "अ" या पदावर, पी.बी. ३: (रु.१५६००-३९१००) + ग्रेड पे रु.७६००/-, या वेतनश्रेणीमध्ये खालील अटींच्या व पुर्ततेच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे:-

१) त्यांनी हा शासन निर्णय त्यांना मिळाल्यापासून ३० दिवसात सदर पदावर रूजू व्हावे. विहित मुदतीत ते सदर पदावर रुजू न झाल्यास त्यांच्या नियुक्तीचे आदेश कोणतीही

पूर्वसूचना न देता रद्द करण्यात येतील. नियुक्तीसाठी विहित केलेल्या ३० दिवसांच्या कालावधीत अपवादात्मक परिस्थितीत रुजू होणे शक्य नसेल तर मुदतवाढीबाबत त्यांनी तात्काळ समर्थनीय कारणांसह शासनाकडे अर्ज सादर करावा. याबाबतची तपासणी करून, रुजू होण्यासाठी कालावधी वाढवून देणे आवश्यक आहे, अशी परिस्थिती असल्याची खात्री पटल्यावर त्यांना नेमणूकीच्या पदावर हजर होण्यासाठी कालावधी वाढवून देण्याबाबत शासन स्तरावर निर्णय घेण्यात येईल.

२) त्यांनी नियुक्ती स्वीकारण्यासाठी करावा लागणारा प्रवास खर्च, स्वत: करणे आवश्यक आहे.

३) सदर पदाचा कार्यभार धारण केल्याच्या दिनांकापासून त्यांचा त्या पदावरील एक वर्षाचा कालावधी हा, परिविक्षाधीन कालावधी असेल. परिविक्षाधीन कालावधीतील त्यांचे काम व वर्तणूक समाधानकारक नसेल तर त्यांच्या या पदावरील सेवा कोणत्याही आगाऊ सूचना न देता समाप्त करण्यात येतील.

४) नियुक्ती नंतर त्यांचे कामकाज समाधानकारक नाही, असे आढळून आल्यास किंवा त्यांची वर्तणूक शासकीय सेवकास शोभेशी नाही असे आढळून आल्यास, त्यांची सेवा कोणतीही पूर्वसूचना न देता समाप्त करण्यात येईल.

५) ते शासनाने विहीत केलेल्या मराठी व हिंदी परीक्षा सदर नियुक्तीपूर्वी उत्तीर्ण झालेले नसतील किंवा या परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळण्यास ते पात्र नसतील तर शासनाने विहीत केलेल्या मराठी व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे, त्यांना आवश्यक आहे.

६) त्यांच्याकडे शासनाने विहीत केलेली संगणक अर्हता नसल्यास ती त्यांनी शासनाने विहीत केलेल्या कालावधीत प्राप्त करणे आवश्यक आहे

७) महाराष्ट्र शासनाच्या गट "अ" अधिकाऱ्यांना लागू असलेले सर्व नागरी सेवा विषयक नियम त्यांना लागू राहातील.

८) त्यांना शासकीय सेवेचा राजीनामा द्यावयाचा असल्यास, त्यांनी एक महिन्याची पूर्वसूचना शासनास देणे आवश्यक राहील अथवा एक महिन्याचे वेतन शासनाकडे जमा करणे आवश्यक राहील.

९) त्यांना निवृत्ती वेतन विषयक "राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजना (NPS)" योजना लागू राहील.

२. ले. कर्नल (निवृत्त) उदय सुधाकर पोळ हे संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद ह्या पदावर रुजू झाल्याच्या दिवसापासून शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसपीआय२००९/ प्र.क्र.२९२/का-२८, दिनांक ०५ मार्च, २०१० अन्वये सदर पदाचा अतिरिक्त कार्यभार धारण करीत असलेले मेजर (निवृत्त) चं. वि. कुलथे, जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, औरंगाबाद यांचा अतिरिक्त कार्यभार समाप्त होईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९२५१६१२००३९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DARADE PRADEEP L

Digitally signed by DARADE PRADEEP L
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DARADE PRADEEP L
Date: 2014.09.25 16:24:28 +05'30'

**(प्र.ल.दराडे)**

अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.राज्यमंत्री (मासैक) यांचे खाजगी सचिव,
४. मा. मुख्य सचिवांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
६. महालेखापाल (लेखा व परीक्षा), १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
७. मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव.
८. * सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
९. विभागीय आयुक्त, पुणे/ कोकण/ अमरावती/ नागपूर/ नाशिक/ औरंगाबाद.
१०.सर्व जिल्हाधिकारी.

११.संचालक, सैनिक कल्याण विभाग,"रायगड" राष्ट्रीय युध्द स्मारकासमोर,घोरपडी,पुणे-४११ ००१.

१२. ले. कर्नल (निवृत्त) उदय सुधाकर पोळ , "अव्दैत", दक्षतानगर, ढवन वस्तीजवळ, सावेडी, अहमदनगर-४१४ ००३. (अंडर सर्टीफिकेट ऑफ पोस्टींग)

१३.संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था,एन-१२ सेक्टर, सिडको, औरंगाबाद-४३१ ००३ (५ प्रती)

१४. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.

१५. मेजर (निवृत्त) चं. वि. कुलथे, जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, जिल्हा सैनिक कल्याण कार्यालय, औरंगाबाद.

१६. अधिक्षक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, ए-१२ सेक्टर, सिडको, औरंगाबाद-४३१ ००३.

१७.सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन १९-अ, मंत्रालय, मुंबई-३२.

१८. निवड नस्ती (२ प्रती).

टिप :- * पत्राने पाठवणे.